**महाराष्ट्र शिक्षण सेवा गट ब (तां.) या संवर्गातील जाहिरात क्र.९१/२०१३ मधील प्रतीक्षा यादीतून शिफारशीत श्री.नाईकनवरे रामदास प्रल्हाद यांच्या नामनिर्देशाने पदस्थापनेत बदलाबाबत.**

## महाराष्ट्र शासन

**कौशल्य विकास व उद्योजकता विभाग**

**शासन आदेश क्रमांक: व्यशिअ-२०१६/(२१७/१६)/व्यशि-१**

मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.

**दिनांक: १५ जानेवारी २०१९.**

**संदर्भ:-** १) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे गोपनीय पत्र क्र.१५(२)(१२०)/६५८/सात-अ, दि.१६.०९.२०१६.

२) शासनाचे समक्रमांकित दि.३१.०७.२०१७ रोजीचा आदेश.

३) शासनाचे आदेश क्र. न्यायाप्र-२०१६/(२२२/१६)/व्यशि-१ दि.१८.०८.२०१७.

४) शासनाचे आदेश क्र. न्यायाप्र-२०१६/(२२२/१६)/व्यशि-१ दि.२४.०९.२०१८.

५) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, म.रा., मुंबई यांचे पत्र क्र.३/आस्था-१/सरळसेवा/२०१८/प्र.क्र.२०९, दि.२७.०९.२०१८.

## आदेश

व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयांतर्गत महाराष्ट्र शिक्षण सेवा गट ब (तांत्रिक) या संवर्गातील प्राचार्य/उपप्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था, मुख्याध्यापक/अभियांत्रिकी अधीक्षक, शासकिय तंत्र माध्यमिक शाळा, या पदांवर वेतनश्रेणी रु.९३००-३४८००/- ग्रेड पे रु.४८००/- मध्ये महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या संदर्भाधीन क्र.१ च्या पत्रान्वये प्रतीक्षा यादीतून शिफारस करण्यात आलेल्या उमेदवारांना संदर्भाधीन क्र.२ येथील शासन आदेशान्वये ते ज्या दिनांकापासून पदाचा कार्यभार स्विकारतील त्या दिनांकापासून २ वर्षाच्या परिविक्षाधीन कालावधीसाठी नामनिर्देशनाद्वारे तात्पुरती नियुक्ती देण्यात आली होती. सदर नियुक्तीस संदर्भ क्र.३ येथील शासन आदेशान्वये तात्पुरती स्थगिती देण्यात आली होती. तद्नंतर संदर्भ क्र.४ येथील आदेशान्वये सदर तात्पुरती स्थगिती उठविण्यात येवून, सदर प्रकरणी मा.न्यायालयात दाखल झालेल्या विविध याचिकांच्या अंतिम निकालाच्या अधिन राहून दि.३१.०७.२०१७ रोजीच्या आदेशाप्रमाणे नियुक्त्या देण्यात आल्या आहेत.

२. तथापि, संदर्भ क्र.५ अन्वये संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, म.रा.,मुंबई यांनी उपरोक्त आदेशातील अ.क्र.६ येथील श्री.नाईकनवरे रामदास प्रल्हाद यांना दर्शविण्यात आलेली उपप्राचार्य, औ. प्र.संस्था, जळगाव, जि.जळगाव हे पद रिक्त नसल्यामुळे त्यांच्या पदस्थापनेबाबत सुधारित आदेश निर्गमित होणेबाबत शासनास विनंती केली होती. त्यानुसार आता श्री.नाईकनवरे रामदास प्रल्हाद यांच्या नावासमोरील स्तंभ क्र.४ मध्ये खाली दर्शविल्याप्रमाणे त्यांच्या पदस्थापनेत बदल करण्यात येत आहे:-

| अ. क्र. | उमेदवाराचे नाव | दि.३१.७.२०१७ रोजीच्या आदेशान्वये नामनिर्देशनाद्वारे नेमणुकीचा विभाग व ठिकाण | सुधारित पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री.नाईकनवरे रामदास प्रल्हाद | **(नाशिक विभाग)** उपप्राचार्य, औ.प्र.संस्था, जळगाव, जि.जळगाव. | **(नाशिक विभाग)** प्राचार्य, औ.प्र.संस्था, शहादा, जि.नंदूरबार. |

**२.** संदर्भाधिन क्र.२ येथील व संदर्भाधिन क्र.४ येथील अनुक्रमे दि.३१.०७.२०१७ व दि.२४.०९.२०१८ रोजीच्या आदेशातील सर्व अटी व शर्ती लागू राहातील.

**३.** सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक क्र.: २०१९०११५१६२१४९५००३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dr.Manish Sheshrao Milke

Digitally signed by Dr.Manish Sheshrao Milke
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Skill Development And Entrepreneurship Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=116b8d4fe32ec9c9f7698810f585f3247df16981777aa4a590ca4347b30d6d0c, cn=Dr.Manish Sheshrao Milke
Date: 2019.01.15 16:31:28 +05'30'

**(डॉ.मनिष शे.मिलके)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) संचालक,व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, म.रा., मुंबई-१.
(त्यांच्या स्तरावरुन आवश्यक ती कार्यवाही करुन त्याबाबतचा अनुपालन अहवाल त्वरीत शासनास सादर करावा)
२) सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, नाशिक. (संचालकामार्फत)
३) सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, औरंगाबाद. (संचालकामार्फत)
४) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर. (संचालकामार्फत)
५) महालेखापाल, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर. (संचालकामार्फत)
६) जिल्हा कोषागार अधिकारी, (सर्व संबंधित संचालकांमार्फत)
७) उपकोषागार अधिकारी, (सर्व संबंधित संचालकांमार्फत)
८) श्री.नाईकनवरे रामदास प्रल्हाद, सुयोग अपार्टमेंट, सिग्नल कॅम्प, देशी केंद्र हायस्कूल जवळ, ता.जि., लातूर-४१३५०८. (संचालकामार्फत)
९) प्राचार्य, औद्योगिक प्रशिण संस्था, जळगाव, जि.जळगाव. (संचालकामार्फत)
९) प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था, शहादा, जि.नंदूरबार. (संचालकामार्फत)
१०) निवड नस्ती (व्यशि-१)